**" शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्र व शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, वसई या संस्थांच्या प्रशासकीय व कार्यशाळा इमारत बांधकामाच्या रूपये २,८३,२५,५४७/- इतक्या रकमेच्या खर्चास देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करणेबाबत."**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: प्रशामा- २८११/२०१८/प्र.क्र.८८/व्यशि-२,**
४ था मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २० ऑक्टोंबर, २०१८.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक शातांवि २००६/(१७/०६)/व्यशि-३, दिनांक २३ फेब्रुवारी, २००६.
२) सहाय्यक संचालक (तां), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक १४/मालमत्ता विभाग/वसई/२०१८/प्र.क्र.१३८/२७४, दिनांक १७/१०/२०१८.

**प्रस्तावना :-**

शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्र, वसई व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, वसई या संस्थांकरीता मौजे किरवली, वसई येथील शासकीय भूखंडावर एकत्रितपणे इमारत बांधकामाच्या रूपये २,८३,२५,५४७/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दिनांक २३/०२/२००६ रोजीच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, उपरोक्त दोन्ही संस्थेकरीता संपादित करण्यात आलेला भूखंड हा किनारी नियंत्रण रेषा या नियमाखाली बाधीत झाल्यामुळे, संपादित भूखंडावर कोणतेही बांधकाम करण्यात आलेले नसल्यामुळे संचालनालयाच्या वरिल संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक १७/१०/२०१८ रोजीच्या पत्रान्वये शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्र, वसई व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, वसई या संस्थेच्या नमुना नकाशा ५२१९ (G+1) वर आधारीत एकत्रित इमारत बांधकामाच्या रूपये २,८३,२५,५४७/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दिनांक २३/०२/२००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्याची विनंती केलेली आहे. त्यानुसार शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्र, वसई व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, वसई या संस्थेच्या एकत्रित इमारत बांधकामाच्या रूपये २,८३,२५,५४७/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दिनांक २३/०२/२००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्र, वसई व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, वसई या संस्थांकरीता मौजे किरवली, वसई येथील शासकीय भूखंडावर एकत्रितपणे इमारत बांधकामाच्या रूपये २,८३,२५,५४७/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दिनांक २३/०२/२००६ रोजीच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८१०२०१६२४४२१२०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: CN = Santosh Vithal Rokade, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Skill Development Development
Date: 2018.10.23 11:36:45 +05'30'

(संतोष वि. रोकडे)
अवर सचिव, महाराष्ट्र राज्य

**प्रत,**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई.
३. मुख्याध्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्र, वसई जिल्हा ठाणे.
४. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, वसई जिल्हा ठाणे
५. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे.
७. निवड नस्ती (कौशल्य विकास व उद्योजकता विभाग व्यशि-२)